भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजनेमध्ये सुधारणा.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सावियो-२०२१/प्र.क्र.१२८/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०८ ऑक्टोबर, २०२१.

**वाचा :** १. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र: दवसू-२०१५/प्र.क्र.३४७/अजाक, दिनांक ०९ मार्च, २०१८.
२. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र: सावियो-२०२१/प्र.क्र.१९/अजाक, दिनांक २८ जुलै,२०२१.

**प्रस्तावना:**

राज्यातील नागरी व ग्रामीण क्षेत्रातील अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या वस्ती/ गावांचा विकास करण्यासाठी व या घटकांना मुलभूत सुविधा पुरविण्यासाठी मा. लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या कामांना शासनस्तरावरुन मान्यता देण्यासाठी “भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना” अशी राज्यस्तर योजना सन २०१८-१९ पासून राबविण्याचा शासनाने दिनांक ०९ मार्च,२०१८ अन्वये निर्णय घेतलेला आहे. सदर शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याबाबत लोकप्रतिनिधी, स्थानिक स्वराज्य संस्थेचे पदाधिकारी यांच्याकडून वारंवार विचारणा करण्यात येत आहे. तसेच, कोविड-१९ चा प्रादुर्भाव पाहता व सदरची योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी दिनांक ०९ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

“भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर सामाजिक विकास योजना” सुरु करण्याबाबत दिनांक ०९ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयामध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

लोकप्रतिनिधी :-

“या योजनेकरिता लोकप्रतिनिधी म्हणून केवळ विद्यमान खासदार, आमदार यांच्या प्रस्तावाचा विचार होईल” याऐवजी “या योजनेकरिता लोकप्रतिनिधी म्हणून खासदार, आमदार स्थानिक स्वराज्य संस्थेचे सर्व सदस्य व पदाधिकारी यांच्या प्रस्तावाचा विचार होईल.”

सर्वसाधारण अटी व शर्ती :-

त्यामध्ये मुद्दा क्र. २ मध्ये “ शासन स्तरावर मंजूर झालेल्या कामांमध्ये अपवादात्मक परिस्थितीत बदल करण्याचे अधिकार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाला राहतील.” याऐवजी “शासन स्तरावर मंजूर झालेल्या कामामध्ये अपवादात्मक परिस्थितीत बदल करण्याचे अधिकार ज्या लोकप्रतिनिधींने ते काम सुचविले आहे त्याच लोकप्रतिनिधीने लेखी विनंती केल्यास सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग त्यावर आवश्यक ती कार्यवाही करेल:-

तसेच सदर शासन निर्णयामध्ये खालील मुद्द्यांचा समावेश करण्यात येत आहे.

१. सद्य:स्थितीत कोविड-१९ चा प्रादुर्भाव विचारात घेता व शासनाकडे उपलब्ध असलेला मर्यादित निधी विचारात घेता या योजनेंतर्गत लोकप्रतिनिधी यांनी सुचविलेली कामे शासन स्तरावर तत्वत: मंजूर करण्यात येऊन सदर कामांना सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

२. या कामांची तात्रिक तपासणी, कामाची मोजमापे याबाबतची सर्व कामे, संबंधीत प्रशासकीय विभाग ज्या कार्यान्वित एजन्सी/ यंत्रणेमार्फत करु इच्छिते त्याच कार्यान्वित एजन्सी/ यंत्रणेमार्फत करु शकतील. याबाबत काही अडचणी उद्भवल्यास याबाबतची जबाबदारी संबंधीत काम करणाऱ्या यंत्रणेची / एजन्सीची राहील.

३. सदरची कामे पूर्ण झाल्यानंतर संबंधित प्रशासकीय विभागातील कार्यान्वित एजन्सी/ यंत्रणा याबाबतची देयके संबंधित सहाय्यक आयुक्त यांच्याकडे सादर करतील. सदर कामाची देयके प्राप्त झाल्यानंतर ती तपासून कोणत्याही परिस्थितीत आठ दिवसांच्या आत त्यासाठी आवश्यक असणाऱ्या निधीची मागणी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्याकडे करतील.

४. प्रत्येक जिल्ह्यातून सदर योजनेची कामे पूर्ण झाल्यानंतर सहाय्यक आयुक्त यांनी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी निधी उपलब्ध करुन देण्याबाबतची मागणी प्राप्त झाल्यानंतर आयुक्त, समाजकल्याण कार्यालय सदर देयकाची स्वतंत्र रजिस्टर मध्ये प्राथम्याने त्याबाबतची नोंद घेतील. तद्नंतर ज्या जिल्ह्यांची देयके प्रथम प्राप्त झाली आहेत. त्या जिल्ह्यांना प्रथम या तत्वानुसार व निधी उपलब्धतेनुसार संबंधित जिल्ह्यासाठी निधी उपलब्ध करुन देतील. सदरची कार्यवाही देयके प्राप्त झाल्यापासून दहा दिवसांच्या आत करण्यात यावी.

५. सदर कामांचा निधी आयुक्त, समाजकल्याण यांच्याकडून संबंधित जिल्ह्याच्या सहाय्यक आयुक्त यांच्याकडे निधी प्राप्त झाल्यानंतर त्यांनी आठ दिवसात संबंधित काम केलेल्या एजन्सी/ यंत्रणेला वितरीत करावा.

६. या प्रक्रियेमध्ये शासनाने विहित केलेल्या कालावधीत कार्यवाही पूर्ण न केल्यास अथवा जाणूनबूजून विलंब केल्याचे निदर्शनास आल्यास सर्व संबंधीत अधिकाऱ्यांवर शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११००८१७४८०९१९२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

RAJENDRA
NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, pseudonym=AE89A440549540E82C5C3FE007D468E20DCA5112, serialNumber=F049989DBBEF93340E9EDD88AF960A0963746D42BAA5C948405B62E821529A99, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2021.10.08 17:52:11 +05'30'

**( रा. ना. सवने )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,

२. सर्व सन्माननीय सदस्य, विधान सभा/ विधान परिषद,
३. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई, महाराष्ट्र राज्य,
४. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
५. मा. उप मुख्यमंत्री, तथा मंत्री (वित्त व नियोजन) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
६. मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
७. मा. राज्यमंत्री ( सा.न्या.) यांचे खाजगी सचिव,
८. मा. राज्यमंत्री (वि.स.) यांचे खाजगी सचिव,
९. मा. मंत्री सर्व यांचे खाजगी सचिव,
१०. मा. राज्यमंत्री सर्व यांचे खाजगी सचिव,
११. मा. अमुस/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, महाराष्ट्र राज्य,
१३. मा. प्रधान सचिव (सा.न्या. ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४. विभागीय आयुक्त सर्व महसूल विभाग, महाराष्ट्र राज्य,
१५. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई,
१६. आयुक्त, सर्व महानगरपालिका, महाराष्ट्र राज्य,
१७. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
१८. सर्व जिल्हाधिकारी,
१९. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा, महाराष्ट्र राज्य,
२०. मुख्याधिकारी सर्व नगर परिषद/ नगरपालिका, महाराष्ट्र राज्य,
२१. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
२२. सर्व सहायक आयुक्त, समाज कल्याण,
२३. निवडनस्ती (अजाक).